**“गडचिरोली जिल्ह्यातील राज्यहद्द ते गोंदिया गोरेगांव सडक अर्जूनी गडचिरोली चामरोशी रस्त्यावरील सा.क्र. १७१/६०० मध्ये कठाणी नदीवर उंच पूलाचे बांधकाम करणे (प्ररामा-११)” या कामाच्या अधिक्य टिप्पणी प्रस्तावास मंजूरी प्रदान करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - सुप्रमा -२०१६/प्र.क्र.५२/रस्ते-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्र. पिएलएन-२०१३/सीआर-(४९८)/नि-३, दिनांक २३/०८/२०१३ अन्वये गडचिरोली जिल्ह्यातील राज्यहद्द ते गोंदिया गोरेगांव सडक अर्जूनी गडचिरोली चामरोशी रस्त्यावरील सा.क्र. १७१/६०० मध्ये कठाणी नदीवर उंच पूलाचे बांधकाम करणे (प्ररामा-११) या कामाच्या रु.१५,००,००,०००/- (रुपये पंधरा कोटी, फक्त) अंदाजित खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदरच्या अंदाजपत्रकात पूल, पोचमार्ग व संकीर्ण बाबींचा समावेश आहे. मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी सदर कामासाठी रु.१८,७१,९८,२६३/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक शासनास सादर केले आहे. सदरच्या अंदाजपत्रकात पूल बांधणे, पोचमार्ग व संकीर्ण बाबींचा समावेश आहे. सदर कामाच्या रु. १८,७१,९८,२६३/- (रुपये अठरा कोटी, एक्काहत्तर लक्ष, अठ्याण्णव हजार, दोनशे त्रेसष्ठ फक्त) इतक्या रकमेच्या अधिक्य टिप्पणीस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गडचिरोली जिल्ह्यातील राज्यहद्द ते गोंदिया गोरेगांव सडक अर्जूनी गडचिरोली चामरोशी रस्त्यावरील सा.क्र. १७१/६०० मध्ये कठाणी नदीवर उंच पूलाचे बांधकाम करणे (प्ररामा-११) या कामाच्या अधिक्य टिप्पणीच्या रु. १८,७१,९८,२६३/- (रुपये अठरा कोटी, एक्काहत्तर लक्ष, अठ्याण्णव हजार, दोनशे त्रेसष्ठ फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. नियोजन विभागाने सदर प्रस्तावास मान्यता प्रदान केलेली आहे.

३. मुख्य अभियंता यांनी सदर कामावर रु. १८,७१,९८,२६३/- पेक्षा जादा खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर कामावरील खर्च लेखाशीर्ष ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च, ०३, राज्यमार्ग या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२७ डिसेंबर, २०१८ रोजीच्या बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०१२११५५३४४००१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29, serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d5680944 59d7ff8219a1f968860a431f89, cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2019.01.21 15:56:52 +05'30'

**( चं. प्र. जोशी )**
**सचिव (रस्ते)**

**प्रत,**

१) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई
२) महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
३) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) नागपूर.
४) महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) वित्त विभाग, (व्यय-११) मंत्रालय, मुंबई-४०००३२
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
८) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, गडचिरोली
१०) निवडनस्ती कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.